**श्री साईबाबा मंदिर, शिर्डी परिसरातून जुन्या प्रसादालयात जाण्या-येण्यासाठी नगर-मनमाड रस्त्यावर पादचारी पूल (Sky walk) बांधण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सासंवि-१०१७/९२४/प्र.क्र.१००/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३१ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :-** १. श्री साईबाबा संस्थान व्यवस्थापन समितीच्या दि.२५.०२.२०१७ रोजीच्या सभेतील निर्णय क्र.१४७

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे पत्र जा.क्र.एसएसएसटी/बांधकाम/१०३३/२०१७, दि.२९.०५.२०१७

**प्रस्तावना :-**

श्री साईबाबांच्या दर्शनासाठी शिर्डीत येणाऱ्या साईभक्तांना संस्थानमार्फत विविध पायाभूत सोयी सुविधा उपलब्ध करुन दिल्या जातात. मौजे शिर्डी येथील सार्वजनिक सोयी सुविधांचा विस्तार करण्याच्या दृष्टीने व ज्याचा प्रामुख्याने साईभक्तांना उपयोग होईल, अशी विकास कामे श्री साईबाबा संस्थान व्यवस्थापन समितीद्वारे केली जातात.

२. श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम-२००४ मधील कलम २१ च्या पोट कलम १ (ग) अन्वये भक्तांना देवतेच्या दर्शनासाठी व मंदिरात प्रार्थनेसाठी किंवा कोणतेही धार्मिक कार्य किंवा समारंभ पार पाडण्याकरीता सोयी आणि सुविधा पुरविण्यासाठी संस्थानच्या निधीचा विनियोग करता येईल अशी तरतूद करण्यात आली आहे.

३. शिर्डी शहरातून जाणारा नगर-मनमाड रस्ता आता सिन्नर - अहमदनगर राष्ट्रीय महामार्ग - क्र.१६० झाला असून या रस्त्यावर पादचारी पूल उभारल्यास श्री साईबाबा समाधी मंदिरातून जुने प्रसादालय परिसरात जाण्या-येण्यासाठी सोईस्कर मार्ग तयार होणार आहे. तसेच साईभक्तांच्या अपघाताचे प्रमाण देखील कमी होणार आहे. शिवाय सदर रस्त्यावरील रहदारीला होणारी अडचण कमी होणार नाही, या सर्व बाबी विचारात घेऊन नगर-मनमाड रस्त्यावर म्हणजेच सिन्नर-अहमदनगर राष्ट्रीय महामार्ग- क्र.१६० या मार्गावर श्री साईबाबा संस्थानच्या निधीतून पादचारी पूल बांधण्याचा निर्णय श्री साईबाबा संस्थान व्यवस्थापन समितीच्या दि. २५.०२.२०१७ रोजीच्या बैठकीत घेण्यात आला आहे. सदर निर्णयास मान्यता देण्याची विनंती मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था यांनी संदर्भ

क्रमांक २येथील पत्रान्वये केली आहे. सदर प्रस्तावाला मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शिर्डी शहरातून जाणाऱ्या सिन्नर-अहमदनगर राष्ट्रीय महामार्ग क्र. १६० वर (नगर-मनमाड रस्त्यावर ) श्री साईबाबा समाधी मंदिरातून जुने प्रसादालय परिसरात जाण्या-येण्यासाठी श्री साईबाबा मंदिर परिसराच्या गेट नं. १ जवळ श्री साईबाबा संस्थानमार्फत Design and build या तत्वावर पादचारी पूल (Sky walk) बांधण्यासाठी व याकरीता होणारा रु.१,०३,१९,९०२/- इतका खर्च श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्थेच्या निधीतून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पदाचारी पुलाचे प्रत्यक्ष काम सुरू करण्यापूर्वी श्री साईबाबा संस्थानने शिर्डी नगरपंचायत, शिर्डी यांची व आवश्यकतेप्रमाणे अन्य स्थानिक प्रशासकीय यंत्रणांची परवानगी घेणे बंधनकारक राहील.

३. सदर पादचारी पुलाचे अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांनी तपासले असून सदर अंदाजपत्रक तांत्रिकदृष्टया योग्य असल्याचे प्रमाणित केले आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०११७२५०६३११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rakhi V. Chavan

Digitally signed by Rakhi V. Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, cn=Rakhi V. Chavan
Date: 2017.09.01 17:15:42 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति,**

१. मा,मुख्यंमत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, विधि व न्याय विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर.
६. सदस्य, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिडी, जि. अहमदनगर
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर.
८. कार्यकारी अभियंता, जागतिक बँक प्रकल्प (सा.बां) विभाग, अहमदनगर
९. निवड नस्ती/का.१६.